निलंबन कालावधी धरुन अनुपस्थितीच्या कालावधीबद्दल द्यावयाचे वेतन व भत्ते यांचे प्रदान विनाविलंब करणेबाबत.

महाराष्ट्र शासन,
वित्त विभाग,
परिपत्रक क्रमांक-निलंब-1092/प्र.क्र. 53/92/सेवा-2,
मंत्रालय, मुंबई 400 032. दिनांक 27 मे 1993.

परिपत्रक

सेवेतून बडतर्फ करण्यात आलेल्या, सेवेतून काढून टाकण्यात आलेल्या किंवा सक्तीने सेवानिवृत्त करण्यात आलेल्या किंवा निलंबनाधीन असलेल्या शासकीय कर्मचा-याला जेव्हा सेवेत पुनःस्थापित करण्यात येते किंवा तो नियतवयमानानुसार सेवानिवृत्त झाला नसता तर त्याला अशाप्रकारे पुन्हा सेवेत पुनःस्थापित करण्यात आले असते, अशा कर्मचा-यांच्या बाबतीत महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, 1981 मधील नियम, 70, 71, 72 च्या तरतुदीनुसार पुढील बाबीं संबंधीत विशिष्ट आदेश काढावे लागतात.

(1) निलंबन कालावधी व/अथवा सेवाबाह्य कालावधीबद्दल द्यावयाचे वेतन व भत्ते.

आणि

(2) उपरोक्त कालावधी हा सर्व प्रयोजनांसाठी कामावर व्यतीत केलेला कालावधी धरण्यात यावा किंवा कसे.

2. शासनाच्या असे निदर्शनास आले आहे की, निलंबन कालावधी व/अथवा सेवाबाह्य कालावधीबद्दल वर नमूद केल्याप्रमाणे आदेश काढल्यानंतर संबंधित कर्मचा-यास त्या आदेशाप्रमाणे वेतन व भत्त्यांचे प्रदान करण्यास कार्यालय प्रमुखाकडून खूपच विलंब होतो. त्यामुळे संबंधित शासकीय कर्मचा-याला निष्कारण त्रास सोसावा लागतो. म्हणून कार्यालय प्रमुखाना असे निदेश देण्यात येत आहेत की, त्यांनी वर नमूद केलेले आदेश काढल्यानंतर त्या आदेशानुसार संबंधित कर्मचा-याला द्यावयाचे वेतन व भत्ते विनाविलंब प्रदान करावेत. ज्या प्रकरणी असे प्रदान करण्यापूर्वी उपरोक्त नियमांच्या नियम 73 प्रमाणे शासनाच्या पूर्वसंमतीची गरज असते अशा प्रकरणी याबाबतचा प्रस्ताव आवश्यक त्या कागदपत्रांसह शासनाकडे विनाविलंब पाठविला जाईल व शासनाचे आदेश प्राप्त होताच संबंधित कर्मचा-याला वेतन व भत्ते यांचे प्रदान विनाविलंब केले जाईल याची दक्षता घ्यावी. याबाबतची जबाबदारी संबंधित कार्यालय प्रमुखाची राहील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

बा. व. सावंत,
शासनाचे अवर सचिव.

प्रत रवाना:-

महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर,
महालेखापाल-1 (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल-2 (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर,
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,

निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
राज्यपालांचे सचिव,
मुख्य मंत्र्यांचे सचिव,
मंत्रालयातील सर्व विभाग,
सर्व विभागीय आयुक्त,
मंत्रालयाच्या सर्व विभागांखालील विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख,
* प्रबंधक, मूळ न्याय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
* प्रबंधक, अपिल शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
* प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली,
निवड फाईल, कार्यासन सेवा2.

* पत्राद्वारे

---

एच-393(12,960+40-6-93)-अ